**वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवर १९ व २ नवीन प्रादेशिक कार्यालयांसाठी २२ अशी एकूण ४१ नवीन पदे निर्माण करण्यास आणि अनुक्रमे १४ व ६ अशा एकूण २० मनुष्यबळसंख्येच्या प्रमाणात सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पदनि २४२०/प्र.क्र. १४५/२०२०/वैसेवा -१**
गो.ते.रुग्णालय संकुल इमारत, ९ वा मजला
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०० ००१.
तारीख: ६ ऑक्टोबर, २०२१

**प्रस्तावना :-**

सन १९७० मध्ये आरोग्य सेवा व वैद्यकीय शिक्षण या दोन विभागाचे स्वतंत्र संचालनालय सूरु करण्यात आले त्यावेळी संचालनालयाच्या अधिनस्त ५ शासकीय वैद्यकीय महाविद्यालये व अन्य मिळून १७ संस्था कार्यरत होत्या. सदर संस्थामध्ये वर्ग-१ ते वर्ग-४ संवर्गात एकूण ९४०० पदे कार्यरत होती. तद्नंतर शासन निर्णय दिनांक ०२.०४.२००४ अन्वये मंजूर केलेल्या आकृतीबंधानुसार संचालनालय व अधिनस्त १४ महाविद्यालय व अन्य अशा एकूण ४३ संस्थाकरिता एकूण २७,६०८ पदे मंजूर होती . त्यापैकी संचालनालयाकरिता १३३ पदे होती तदनंतर ऑक्टोबर २०२० अखेरपर्यंत १९ शासकीय महाविद्यालय व अन्य अशा एकूण ५७ संस्थांकरिता एकूण ४२,६२९ पदे मंजूर असून त्यापैकी संचालनालयाकरिता २०५ पदे होती. सद्यस्थितीत सातारा, सिंधुदुर्ग, अलिबाग तसेच उस्मानाबाद येथे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय सुरू करण्यात आली आहेत. तसेच औरंगाबाद, लातूर, अकोला, यवतमाळ येथे प्रधान मंत्री स्वास्थ्य सुरक्षा योजनेअंतर्गत ४ अतिविशेषोपचार रुग्णालये सुरु करण्यात आली असून त्याकरीता २९५७ पदे नव्याने निर्माण करण्यात आली आहेत.

२. सद्यस्थितीत राज्यात एम.बी.बी.एस. / बी.डी.एस / बी.पी.टी.एच. याकरिता वेगवेगळया स्वरुपाचे अभ्यासक्रम सुरु असून त्याकरिता अखिल भारतीय स्तरावरील प्रवेश प्रक्रिया संचालनालयाच्या स्तरावरुनच हाताळली जाते. दरम्यानच्या कालावधीत पदवीधर विद्यार्थी संख्या वाढीच्या प्रमाणात प्रशासकीय कामकाजासाठी संचालनालय स्तरावर पदनिर्मिती झालेली नाही.

संचालनालयाच्या अधिनस्त विविध शासकीय वैद्यकीय महाविद्यालयाच्या स्तरानंतर सर्व कामे ही संचालनालयाच्या स्तरावरुन हाताळावी लागतात. त्यामुळे संचालनालयाचे सक्षमीकरण करण्यासाठी मनुष्यबळामध्ये वाढ करणे गरजेचे आहे. तसेच शासकीय वैद्यकीय/दंत महाविद्यालयांनंतर सर्व कामकाज संचालनालयाच्या स्तरावर हाताळावे लागत असल्याने कामाचे विकेंद्रीकरण तसेच कामात सुसुत्रता आणण्याच्या दृष्टीने प्रादेशिक स्तरावर सह संचालक दर्जाच्या अधिकाराच्या अधिनस्त क्षेत्रीय कार्यालये सुरु करणे गरजेचे आहे.

त्यामुळे वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाचे सक्षमीकरणासाठी संचालनालयाच्या स्तरावर ३३ नवीन पदे तसेच क्षेत्रीय स्तरावर दोन प्रादेशिक कार्यालये सुरु करण्यासाठी २८ नवीन पदे अशी एकूण ६१ नवीन पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-**

वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या अधिनस्त कार्यरत शासकीय वैद्यकीय महाविद्यालय तसेच संलग्न रूग्णालयांची संख्या, विद्यार्थी प्रवेश क्षमता वाढत आहे. मात्र संचालयानालयातील अधिकारी, कर्मचारी यांच्या संख्येत त्याप्रमाणात वाढ झालेली नाही. त्यामुळे कामकाज हाताळताना प्रशासकीय अडचणी उद्भवत आहेत. त्यामुळे संचालनालयाचे सक्षमीकरण करण्याच्या अनुषंगाने वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या स्तरावर आयुक्त (वैद्यकीय शिक्षण व संशोधन) हे पद निर्माण करुन त्यांना क्षेत्रीय स्तरावरील विभागप्रमुख म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच क्षेत्रीय स्तरावर २ प्रादेशिक कार्यालये सह संचालक यांच्या अधिपत्याखाली सुरू करण्यास मा. मंत्रीमंडळाच्या दि. ०६.१०.२०२१ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

I. वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाचे सक्षमीकरणासाठी संचालनालयाच्या स्तरावर परिशिष्ट-अ मध्ये नमूद १९ नियमित पदे निर्माण करण्यास तसेच १४ (डाटा एंट्री ऑपरेटर तथा लिपिक) मनुष्यबळ संख्येच्या मर्यादेत सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास मान्यता देण्यात येत आहे.

II. वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयातर्गत क्षेत्रीय स्तरावर २ प्रादेशिक कार्यालये सुरु करण्यासाठी परिशिष्ट-ब मध्ये नमूद २२ नियमित पदे निर्माण करण्यास तसेच ६ (डाटा एंट्री ऑपरेटर तथा लिपिक) मनुष्यबळ संख्येच्या मर्यादेत सेवा बाह्ययंत्रणेद्वारे घेण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर पदांच्या वेतनावर येणाऱ्या रु. २,०९,४६,४४८/- इतक्या वार्षिक खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच दोन कार्यालयांसाठी रु.२०,००,०००/- इतक्या अनावर्ती खर्चास मान्यता देण्यात येत आहे.

III. संचालनालयाच्या स्तरावर आवश्यक नसलेली परिशिष्ठ-क मध्ये नमूद ५० पदे व्यपगत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय स्तरावर निर्माण केलेली आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) व सहसंचालक तसेच क्षेत्रीय स्तरावर सहसंचालक यांच्या अधिपत्याखाली प्रादेशिक कार्यालये यांच्याकडे सूपूर्द केलेल्या कर्तव्य व जबबादाऱ्या तसेच अंतर्भूत असलेल्या संस्थांची यादी परिशिष्ट-ड मध्ये नमूद केली आहे. त्यांच्या कामकाजाच्या वाटपात प्रशासकीय निकडीनुसार बदल करण्याचे अधिकार शासनास राहतील.

३. आयुक्त ( वैद्यकीय शिक्षण) यांच्याकडे संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई संचालनालय व संचालक, आयुष संचालनालय, मुंबई व त्यांच्या अधिनस्त सर्व संस्थांमधील प्रशासकीय व वित्तीय कामकाजाची जबाबदारी सोपविण्यात येत असून त्यांच्याकडे दोन्ही संचालनालयाच्या क्षेत्रीय विभागप्रमुखाचे अधिकार सोपविण्यात येत आहेत. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई व संचालक, आयुष संचालनालय, मुंबई हे आपल्या पदाच्या जबाबदारीच्या अनुषंगाने आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) यांच्यामार्फत शासनास प्रतिवेदन (Reporting) /अहवाल सादर करतील.

४. उपरोक्त नव्याने निर्माण करण्यात आलेल्या पदांचा खर्च मंजूर लेखाशीर्षातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २६१/आपुक, दिनांक २७.०७.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार व मा. मंत्रीमंडळाच्या दि. ०६.१०.२०२१ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२११००७१८१४०३३०१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANIL RAMCHANDRA CHAURE

Digitally signed by ANIL RAMCHANDRA CHAURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=624f4afc32cd2dfb01cbfc1d8ea4b5211a2b6b77d8c9f20c114ea66eb9ebb388, pseudonym=CDA382C9C4F93DF236A34D73279A05E5F48130DB, serialNumber=442E1293BBCF028938E3D674F26AB93E80F0C579F8D94DD6EF3DB6A124829D69, cn=ANIL RAMCHANDRA CHAURE
Date: 2021.10.12 18:40:45 +05'30'

**(अनिल चौरे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (वै.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री (वै.शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. प्रधान सचिव, (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त (वैद्यकीय शिक्षण), वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
१०. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
११. संचालक, आयुष संचालनालय, मुंबई.
१२. अधिष्ठाता, (सर्व) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रूग्णालये.
१३. सर्व सहसचिव / उप सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुबई.
१४. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.

## परिशिष्ट-अ

### वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील नवीन पदांसाठी वार्षिक खर्च

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या | आवश्यक पदांचा १२ महिन्यांचा खर्च (रु.) |
|---|---|---|---|---|
| **नियमित पदे** | | | | |
| १ | आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) (भा.प्र.से.) | (संवर्ग पद) | १ | २४,९०,४०८ |
| २ | सह संचालक | Academic Level-१४ (१४४२००-२१८२००) | १ | ३१,१७,९०० |
| ३ | मुख्य प्रशासकीय अधिकारी | एस-२०:५६१००-१७७५०० | २ | १९,६३,२२४ |
| ४ | विधी अधिकारी | एस-१६:४४९००-१४२४०० | १ | ९,८१,६१२ |
| ५ | प्रशासकीय अधिकारी | एस-१५:४१८००-१३२३०० | ४ | २८,८१,८२४ |
| ६ | कार्यालयीन अधिक्षक | एस-१४:३८६००-१२२८०० | २ | १३,२३,०२४ |
| ७ | वरिष्ठ सहायक | एस-१३:३५४००-११२४०० | ८ | ४८,५८,९४४ |
| | | **एकूण नियमित पदे** | **१९** | **१,७६,१६,९३६** |

| **बाह्ययंत्रणेकडून घ्यावयाच्या सेवा** | | | |
|---|---|---|---|
| अ.क्र. | सेवा | ठोकवेतन (रु.) | आवश्यक पदांचा १२ महिन्यांचा खर्च (रु.) |
| १ | १४ मनुष्यबळ संख्येच्या प्रमाणात बाह्ययंत्रणेद्वारे सेवा | १५००० दरमहा प्रति मनुष्यबळ (१५००० x १४) | २५,२०,००० |
| | | **एकूण** | **२५,२०,०००** |
| | **एकत्रित एकूण** | **३३** | **२,०१,३६,९३६** |

## परिशिष्ट-ब

## क्षेत्रीय स्तरावर २ प्रादेशिक कार्यालयासाठी आवश्यक पदांसाठी येणारा वार्षिक खर्च

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या | आवश्यक पदांचा १२ महिन्यांचा खर्च (रु.) |
|---|---|---|---|---|
| **नियमित पदे** | | | | |
| १ | सह संचालक | Academic Level-१४ (१४४२००-२१८२००) | २ | ५९,५७,४९६ |
| २ | मुख्य प्रशासकीय अधिकारी | एस-२०:५६१००-१७७५०० | २ | १९,६३,२२४ |
| ३ | विधी अधिकारी | एस-१६:४४९००-१४२४०० | २ | १८,५४,०७२ |
| ४ | प्रशासकीय अधिकारी | एस-१५:४१८००- *१३२३००* | २ | १३,९९,२१६ |
| ५ | लेखा अधिकारी | एस-१६:४४९००-१४२४०० | २ | १४,६७,७६८ |
| ६ | सहायक लेखा अधिकारी | एस-१५:४१८००-१३२३०० | २ | १३,५९,२१६ |
| ७ | कार्यालयीन अधिक्षक | एस-१४:३८६००-१२२८०० | ४ | २४,२९,४७२ |
| ८ | वरिष्ठ सहायक | एस-१३:३५४००-११२४०० | ६ | ३४,३५,९८४ |
| | | **एकूण नियमित पदे** | **२२** | **१,९८,६६,४४८** |

| बाह्ययंत्रणेकडून घ्यावयाच्या सेवा | | | |
|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **सेवा** | **ठोक वेतन (रु.)** | **आवश्यक पदांचा १२ महिन्यांचा खर्च (रु.)** |
| १ | ६ मनुष्यबळ संख्येच्या प्रमाणात बाह्ययंत्रणेद्वारे सेवा | १५००० दरमहा प्रति मनुष्यबळ (१५००० x ६) | १०,८०,००० |
| | | **एकूण** | **१०,८०,०००** |
| | **एकत्रित एकूण** | **२८** | **२,०९,४६,४४८** |

## परिशिष्ठ-क

## वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय यांच्या आस्थापनेवरिल निरसित करावयाची पदे

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| **नियमित पदे** | | | |
| १ | वैद्यकीय अधिक्षक | एस-२३:६७७००-२०८७०० | २ |
| २ | कार्यालयीन अधिक्षक | एस-२३: ६७७००-२०८७०० | १ |
| ३ | अधिक्षक मध्यवर्ती कार्यशाळा | एस-२३: ६७७००-२०८७०० | १ |
| ४ | मज्जातंतू विकृतीशास्त्र | एस-२०:५६१००-१७७५०० | १ |
| ५ | सहायक सार्वजनिक अभियंता (पैठण व सावनेर) | एस-१५:४१८००-१३२३०० | २ |
| ६ | परिसेविका | एस-१४:३८६००-१२२८०० | ४ |
| ७ | क्ष-किरण तंत्रज्ञ | एस-१३:३५४००-११२४०० | २ |
| ८ | स्वच्छता निरिक्षक | एस-१६:४४९००-१४२४०० | १ |
| ९ | प्रयोगशाळा सहायक | एस-७:२१७००-६९१०० | २ |
| १० | शस्त्रक्रिया सहायक | एस-६:१९९००-६३२०० | २ |
| ११ | अंधारखोली सहायक | एस-६:१९९००-६३२०० | २ |
| १२ | शस्त्रक्रिया सहायक | एस-१:१५०००-४७६०० | १० |
| १३ | स्वयंपाकी | एस-३:१६६००-५२४०० | ६ |
| १४ | पारिचारीका प्रसविका | एस-८:२५५००-८११०० | ३ |
| १५ | मिडवाईफ | एस-७:२१७००-६९१०० | १ |
| १६ | प्राणीघर पर्यवेक्षक | एस-८:२५५००-८११०० | १ |
| १७ | पाणी गृहपाल/प्राणी परिचर/प्राणी पालपरिचर | एस-१:१५०००-४७६०० | ९ |
| | | **एकूण निरसित करावयाची पदे** | **५०** |

## परिशिष्ट-ड

संचालनालयाच्या सक्षमीकरणासाठी  निर्माण करावयाच्या पदांमध्ये आयुक्त, वैद्यकीय शिक्षण (भा.प्र.से.) त्याचप्रमाणे १ सह संचालक यांचा अंतर्भाव आहे. संचालनालयात सद्या कार्यरत ३ सह संचालक व नव्याने निर्माण करावयाचे १ सह संचालक यांच्यामध्ये खालीलप्रमाणे कामाचे वाटप करण्याचे प्रस्तावित आहे :-

**१) आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) :-**

सार्वजनिक आरोग्य विभागात,  आरोग्य सेवा संचालनालयाअंतर्गत सर्व प्रकारच्या आरोग्य सेवेशी संबंधित तांत्रिक विषय संचालक (आरोग्य सेवा) यांच्यामार्फत आयुक्त (आरोग्य सेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान) यांचेकडे सार्वजनिक आरोग्य विभागाच्या शासन निर्णय दिनांक १८.१०.२०१६ अन्वये सोपविण्यात आला आहे. तसेच त्यांना विभागप्रमुख म्हणून घोषित करण्यात आले आहे. सदर पदावर भारतीय प्रशासकीय सेवेतील अधिकारी कार्यरत आहेत.

त्याधर्तीवरच वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालयाच्या स्तरावर आयुक्त (वैद्यकीय शिक्षण व संशोधन) हे पद नव्याने निर्माण करुन त्यांना क्षेत्रीय स्तरावरील विभागप्रमुख म्हणून घोषित करण्यात येत आहे.  सदर पदावरील अधिकाऱ्याकडे संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई , संचालनालय व संचालक, आयुष संचालनालय, मुंबई तसेच त्यांच्या अधिनस्त सर्व संस्थांमधील प्रशासकीय कामकाजाची जबाबदारी सोपविण्यात यावी. त्यांच्याकडे प्रशासकीय व वित्तीय बाबींच्या अनुषंगाने दोन्ही संचालनालयाच्या प्रादेशिक विभागप्रमुखाचे अधिकार सोपविण्यात येत आहेत. सदर पदावर भारतीय प्रशासकीय सेवेतील अधिकाऱ्याची नियुक्ती करण्यात येईल.

२) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन मुंबई तसेच संचालक, आयुष संचालनालय, मुंबई हे आपल्या पदाच्या जबाबदारीच्या अनुषंगाने आयुक्त,वैद्यकीय शिक्षण व संशोधन यांचेमार्फत शासनास अहवाल सादर करतील.

**३) सहसंचालक (वैद्यकीय) - (प्रशासन):-**

अ) या पदाकडे संचालनालयांच्या अधिनस्त असलेल्या गट-अ ते गट-ड संवर्गाच्या आस्थापना विषयक बाबी  व सर्व प्रशासनिक बाबी हाताळण्याची जबाबदारी यांची राहील. गट- अ ते गट- ड अधिकारी व कर्मचारी यांची न्यायालयीन प्रकरणे हाताळण्याकरीता विधी अधिकारी त्यांना मदत करतील.

ब) प्रस्तुत सहसंचालक हे त्यांच्या अधिनिस्त पुणे व कोकण महसूली विभागातील खालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्न संस्था यांच्याबाबतचे प्रादेशिक स्तरावरील सह संचालकांचे खालीलप्रमाणे कर्तव्य व जबाबदाऱ्या पार पाडतील:-

I. कार्यालयाकडे अधिनस्त असलेल्या सर्व संस्थावर नियंत्रण ठेवणे.

II. अधिनस्त सर्व संस्थाचे लेखा परिक्षण करणे.

III. अधिनस्त संस्थांशी निगडीत न्यायालयीन प्रकरणे हाताळणे.

IV. क्षेत्रीय स्तरावरील सहसंचालकास गट -क संवर्गातील अधिकारी व कर्मचारी यांचे नियुक्तीचे अधिकार व त्या संवर्गातील निर्माण होणाऱ्या विविध प्रकरणाची हाताळणी करण्याचे अधिकार प्रदान करण्यात येतील.

या विभागामध्ये खालीलप्रमाणे संस्था अंतर्भूत राहतील-

१) ग्रॅन्ट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर ज.जी. समूह रुग्णालय, मुंबई.
२) उक्त संस्थेच्या अधिनस्त असलेले सर्व संस्था. (सेंट जॉर्जेस रुग्णालय, गो.ते. रुग्णालय व कामा व आल्ब्लेस रुग्णालय )
३) शासकीय दंत महाविद्यालय, मुंबई.
४) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अलिबाग.
५) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदुर्ग.
६) बै.जी.शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व ससून सर्वोपचार रुग्णालय, पुणे.
७) डॉ. वैशंपायन स्मृती शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, सोलापूर.
८) छत्रपती राजर्षी शाहू महाराज शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, कोल्हापूर.
९) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, रुग्णालय, मिरज, तसेच पद्मभूषण श्री. वसंतदादा पाटील सर्वोपचार रुग्णालय, सांगली.
१०) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, बारामती.
११) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सातारा.

क) शासकीय अधिकारी / कर्मचारी यांच्या सेवाविषयक बाबी हाताळणे आवश्यक असल्याने या पदावर नियमित वैद्यकीय सेवेतील अधिकारी देण्याऐवजी सेवा विषयक कामकाजाचा प्रदिर्घ अनुभव विचारात घेता, मंत्रालयीन संवर्गातील उप सचिव पेक्षा कमी दर्जा नसलेल्या अधिकाऱ्याची प्रतिनियुक्तीने सेवा उपलब्ध करुन घेणे संयुक्तिक ठरेल.

**३) सहसंचालक (वैद्यकीय) - (खरेदी, बांधकाम / बांधकाम सेल / वित्तीय बाबी-अर्थसंकल्प / एच.एम. आय.एस. यंत्रणा): -**

अ) संचालनालयाच्या अंतर्गत यंत्र सामुग्री व सर्जिकल साहित्यांची खरेदी, औषध, अन्नधान्य, भाजीपाला व इतर संपूर्ण खरेदी प्रक्रियेची जबाबदारी राहील.

ब) संचालनालयांच्या अधिनस्त असणाऱ्या सर्व संस्थांच्या बांधकाम संबंधात देखरेख व इतर प्रशासनीक कामकाज पार पाडण्याची जबाबदारी राहील.

क)  अर्थसंकल्पीय बाबी, अनुदान व खर्च, खर्चाचा ताळमेळ व इतर आर्थिक बाबी सांभाळणे.

ड)  शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय मधील विविध सेवांबाबतचा तपशील ऑनलाईन नोंदविण्यासाठी कार्यरत असलेल्या एच.एम. आय.एस. या संगणकीय प्रणालीचे सर्व साधारण नियंत्रण करण्याची जबाबदारी राहील.

**४)  सहसंचालक - दंत (दंतरचना व  कार्यपदध्ती/समन्वय व सांख्यिकी/परिचर्या/बाहयस्रोताने-कंत्राटी कामकाज)**

अ)  संचालनालयाच्या अधिनस्त असलेल्या ३ दंत महाविद्यालयावर नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी राहील.

ब)  दंत महाविद्यालयास लागणारी यंत्रसामुग्री, औषधे, सर्जिकल साहित्य यांची खरेदी प्रक्रिया राबविण्याचे काम तसेच दंत महाविद्यालय बांधकाम व दंत महाविद्यालयाशी संबंधित संपूर्ण  प्रशासकीय बाबी हाताळण्याची जबाबदारी सोपविण्यात येईल.

क)  परिचर्या संवर्गाच्या नियूक्ती पदोन्नती, न्यायालयीन प्रकरणे, तक्रारी इत्यांदी बाबी तसेच परिचर्या महाविद्यालयाचे निर्मितीचे प्रस्ताव व इतर अनुषंगिक बाबी ते पाहतील.

ड)  संचालनालयांच्या कार्यालयातील रचना व कार्यपध्दती कामकाजावर नियंत्रणाची जबाबदारी सोपविण्यात येईल. तसेच संचालनालयांमध्ये कार्यरत असलेल्या विविध शाखामध्ये समन्वय साधण्यासाठी समन्वय शाखा निर्माण करण्यात येईल व त्या शाखेवर नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी यांची राहील. सांख्यिकी शाखेवर नियंत्रण ठेवतील.

इ)  सद्यस्थितीत संचालनालयांच्या अधिनस्त संस्थामध्ये बाह्यस्रोत्रामार्फत वर्ग-४ ची कामे केली जातात. सदर कामाचे नियोजन व कंत्राटी तत्वावर नियुक्ती यावर नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी राहील.

**५)  सहसंचालक (वैद्यकीय) (म.आ.वि.विद्यापीठ, नाशिक/शिक्षण व संशोधन/सी.ई.टी.सेल) :-**

अ)  महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठाशी निगडीत प्रशासकीय व शैक्षणिक बाबीच्या अनुषंगाने सर्व प्रकारचे कामकाज हाताळणे.

ब)  शासकीय वैद्यकीय महाविद्यालय तसेच खाजगी वैद्यकीय महाविद्यालयांमधील आरोग्य विज्ञान व्यवसायीक पदवी अभ्यासक्रम तसेच पदव्युत्तर अभ्यासक्रम आणि अन्य संलग्नित पदव्युत्तर अभ्यासक्रमाबाबत नवीन महाविद्यालयाला परवानगी देणेबाबतचे प्रस्ताव हाताळणे.

क)  आरोग्य विज्ञान अभ्यासक्रमासाठी संपूर्ण प्रवेश प्रक्रियाबाबतचे कामकाज हाताळणाऱ्या संचालनालयाच्या स्तरावरील सी.ई.टी. सेल कक्षावर नियंत्रण ठेवणे.

ड)  वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय अधिनस्त संस्थांमधील वैद्यकीय क्षेत्राशी निगडीत आधुनिक संशोधन कामाचे नियोजन व त्यावर संनियंत्रण ठेवणे.

**क्षेत्रीय स्तरावरील सहसंचालक यांचे अधिपत्याखालील कार्यालयाचे कार्यक्षेत्र खालीलप्रमाणे राहील.**

**अ) नागपूर व अमरावती विभागः-** या महसूल विभागाकरीता नागपूर येथे प्रादेशिक कार्यालय राहील. या विभागाचे मुख्यालय नागपूर येथील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, नागपूर येथे राहील. तसेच या विभागामध्ये खालीलप्रमाणे संस्था अंतर्भुत राहतील.

१. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर व संलग्नित संस्था.
२. इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय,नागपूर.
३. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, गोंदिया.
४. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, चंद्रपूर.
५. श्री.वसंतराव नाईक शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, यवतमाळ तसेच स्त्री रुग्णालय, यवतमाळ
६. शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, अकोला.
७. शासकीय दंत महाविद्यालय, नागपूर.

**ब) औरंगाबाद व नाशिक विभाग :-** या विभागाचे मुख्यालय औरंगाबाद येथील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय औरंगाबाद हे राहील. तसेच या विभागामध्ये संचालनालय, वैद्यकीय शिक्षण व संशोधन अधिनस्त संस्थापैकी खालील संस्था अंतर्भूत राहतील.

(१) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, औरगांबाद.
(२) शासकीय दंत महाविद्यालय औरंगाबाद, कर्करोग रुग्णालय, औरंगाबाद.
(३) स्वामी रामानंद तिर्थ ग्रामीण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, अंबाजोगाई.
(४) विलासराव देशमुख शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर्वोपचार रुग्णालय, लातूर.
(५) डॉ.शंकरराव चव्हाण शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नांदेड.
(६) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, उस्मानाबाद.
(७) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, जळगांव.
(८) डॉ.भाऊसाहेब हिरे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, धुळे.
(९) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नंदूरबार.

**क) मुंबई व पुणे विभाग :-** सहसंचालक वैद्यकीय शिक्षण व संशोधन यांचेकडे हा पदभार राहील व त्यांचे मुख्यालय संचालनालयात राहील.

१) ग्रॅन्ट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व सर ज.जी. समूह रुग्णालय, मुंबई.
२) उक्त संस्थेच्या अधिनस्त असलेले सर्व संस्था (सेंट जॉर्जेस रुग्णालय, गो.ते. रुग्णालय व कामा व आल्ब्लेस रुग्णालय)

३) शासकीय दंत महाविद्यालय, मुंबई.

४) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, अलिबाग.

५) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सिंधुदुर्ग.

६) बै.जी.शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व ससून सर्वोपचार रुग्णालय, पुणे.

७) डॉ. वैशंपायन स्मृती शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, सोलापूर.

८) छत्रपती राजर्षी शाहू महाराज शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, कोल्हापूर.

९) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, रुग्णालय, मिरज, तसेच पद्मभूषण श्री. वसंतदादा पाटील सर्वोपचार रुग्णालय, सांगली.

१०) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, बारामती.

११) शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, सातारा.

**********************